राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत मौजे पानस (ता.जावळी, जि.सातारा ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु - २०१९/प्र.क्र. ३६४/पापु १७**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

**दिनांक: ३१ ऑगस्ट, २०२०.**

वाचा :-

१) ग्रामपंचायत, पानस, ता.जावळी, जि.सातारा यांचा ग्रामसभा ठराव क्रमांक ३, दिनांक १५/०८/२०१२.

२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सातारा यांचे मुळ तांत्रिक मान्यता आदेश, दिनांक १५/०९/२०१२.

३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सातारा यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश दिनांक १६/०३/२०२०.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांचे पत्र जा.क्र.जिप/ग्रापापुवि/तांशा-२/२४६५/१९, दिनांक १५/१०/२०१९.

प्रस्तावना :-

मौजे पानस (ता.जावळी, जि.सातारा ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्रमांक १ येथील ठरावान्वये मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्रमांक २ अन्वये कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सातारा यांनी मुळ अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. प्रस्तुत योजनेच्या कामाच्या जादा दराची निविदा स्विकारण्यात आली आहे. तथापि, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सातारा यांनी संदर्भ क्रमांक ३ अन्वये प्रस्तुत योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यानुसार, मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, सातारा यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्रमांक ४ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या कामात जादा दराच्या निविदा स्विकारल्यामुळे सुधारित आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मौजे पानस ( ता.जावळी, जि.सातारा ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ३२.६३ लक्ष (ढोबळ) **(** अक्षरी बत्तीस लक्ष त्रेसष्ट हजार फक्त ) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, सातारा यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.
४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.
६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.
७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

**०२.** या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रुपये १.१२ लक्ष ( अक्षरी रुपये एक लक्ष बारा हजार फक्त) हा मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम ( राज्य हिस्सा ) ( २२१५ २०७१ ) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८३११२४३४३४४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Adhikrao Bapu Budhe

Digitally signed by Adhikrao Bapu Budhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9b3afc989167fcd7f4487809755a2a08c37958a70b01ce9dd6139bffb1e6896, serialNumber=6dd8309934e3a186f9e32ab2ed268a322fa2805ecbd838d076066aa8f4668bc0, cn=Adhikrao Bapu Budhe
Date: 2020.09.03 12:59:58 +05'30'

**( अ.बा.बुधे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, सातारा.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, पुणे.

१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सांगली / पुणे.
१३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१४) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१५) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सातारा.
१६) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, सातारा.
१७) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सातारा.
१८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२०) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२१) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,१०,१३,१८ व २०), पा. पु. व स्व.वि., मंत्रालय,मुंबई-०१.
२३) निवड नस्ती कार्यासन पापु-१७.